# सामूहिक वनहक्क चळवळ

**– सुबोध कुलकर्णी**

**मुक्काम गडचिरोली :**

गडचिरोली हा महाराष्ट्रातील एक वैशिष्ट्यपूर्ण जिल्हा. याचा ७८% भूभाग हा वनाने व्यापलेला आहे. नैसर्गिक साधनसंपत्तीच्या बाबतीत समृद्ध असूनही राज्यातील सर्वात मागास जिल्हा अशी याची ओळख. लोकसंख्याही अवघी ९ लाख. सन २००८ पासून प्रबोधिनीचा समन्वयक म्हणून येथे काम करताना आलेले विविध अनुभव येथे शब्दबद्ध करीत आहे. या जिल्ह्यात कठीण व गुंतागुंतीच्या परिस्थितीत अत्यंत वेगळ्या विषयांवर काम करताना सर्वच प्रकारे कस लागला. येथील निसर्गाची विविध रूपे न्याहाळताना, आदिवासी जीवनशैली अनुभवताना माझे जगणे समृद्ध झाले. नक्षलवाद–माओवाद अशा समाजविघातक शक्तींच्या छायेत सतत वावरताना विलक्षण प्रसंगांना दक्षतेने, शांततेने कसे सामोरे जायचे याचे भानही आले. मेंढा (लेखा) सारख्या आगळ्यावेगळ्या ग्रामसभेसोबत अध्ययन करता करता, नवीन विकास प्रक्रियेची निर्मिती होताना मनस्वी आनंदही मिळाला.

**मेंढा (लेखा) येथील कृती गट :**

गडचिरोलीत आल्यानंतर पहिल्या दोन–तीन महिन्यांत विविध तालुक्यांमध्ये फिरून प्रत्यक्ष परिस्थिती जाणून घेतली. येथील विविध संस्था, संघटना, व्यक्ती यांचा जवळून परिचय करून घेतला. सर्वांशी झालेल्या चर्चांमधून कामाची दोन सूत्रे ठरविली. एक – येथील सर्वात महत्त्वाच्या समस्येवर थेट लोकांसोबत काम व दुसरे – लहान संस्थांना क्षमता विकासात मदत करायची, वन आधारित व्यवसाय निर्मितीचे प्रयत्न करावयाचे प्राधान्याने ठरविले. मेंढा (लेखा) येथील अभ्यासमंडळ व विविध संस्थांचे वैनगंगा अभ्यासमंडळ या रचनांमध्ये नियमित सहभागी झाल्याने या कामांना दिशा मिळाली. लवकरच वृक्षमित्र संस्थेचे मोहन हिराबाई हिरालाल, मेंढ्याचे देवाजी तोफा आणि मी असा एकमेकांना पूरक असा कृतीगट तयार झाला. पुढे विषद केलेल्या सर्वच कामांमध्ये या गटाचा अत्यंत महत्त्वाचा सहभाग आहे.

मेंढ्यातील पहिल्याच कामाने अनेक गोष्टी शिकविल्या. ग्रामसभेच्या नावाने एका दूरच्या जिल्ह्यातल्या अपरिचित संस्थेने मानव विकास मिशन अंतर्गत परस्पर प्रकल्प मंजूर करून घेतला होता. जवळजवळ रु.१५ लाख, बोगस प्रशिक्षण व साहित्यावर खर्च झाला होता. सहज मागून माहिती मिळेना, मग माहितीचा अधिकार वापरून ती मिळविली. उरलेल्या रु.१० लाखांमध्ये फक्त प्रक्रिया संयंत्र बसविले जाणार होते. इतर सुविधा, खेळते भांडवल वगैरेसाठी तरतूदच नव्हती. मध संकलन गटाने मग विविध ठिकाणच्या प्रक्रिया केंद्रांना भेटी देऊन अभ्यास केला. वर्धा येथील तज्ज्ञ गोपाल पालीवाल यांच्या सहकार्याने आम्ही सर्व सुविधांनी परिपूर्ण अशा कमी खर्चातील केंद्राची रचना तयार केली. रु. पाच लाखात इमारत, वीज, पाणी, संयंत्र, पॅकिंग साहित्य आणि खेळते भांडवल असे अंदाजपत्रक तयार करून जिल्हाधिकाऱ्यांना भेटलो. पैसे तर पूर्वीच्या संस्थेला दिले होते, ती दाद देईना. शेवटी गुन्हा दाखल करण्याचा इशारा दिल्यावर त्यांनी १० लाख परत केले. या रकमेतून मेंढा तसेच कुरखेडा तालुक्यातील येरंडी येथे सृष्टी संस्थेच्या सहकार्याने दोन ठिकाणी स्वयंपूर्ण अशी प्रक्रिया केंद्रे उभारली गेली. मधमाशांना इजा न पोचविता अहिंसक पद्धतीने येथील वनवासी मध संकलन करत आहेत. गेल्या दोन वर्षातच 'मेंढा' व 'सृष्टी' हे मधाचे ब्रँड लोकप्रिय झाले आहेत. प्रबोधिनीचे मित्र श्री. रविंद्र आपटे यांच्या साहाय्याने या कामावर एक सुंदर डॉक्युमेंटरीही तयार केली. कमी खर्चातले व समुचित तंत्रज्ञान वापरून उभारलेल्या या प्रक्रिया केंद्राच्या रचनेचा विस्तार आता देशात अनेक ठिकाणी होत आहे.

**आमच्या गावात आम्हीच सरकार :**

मेंढा (लेखा) हे गोंड आदिवासी समाजाचे १०० घरांचे, ५०० लोकसंख्येचे धानोरा तालुक्यातील संवेदनशील भागातील एक छोटेसे गाव. या गावाने अंगिकारलेल्या एका घोषणेने – ''दिल्ली, मुंबईत आमचे सरकार, आमच्या गावात 'आम्हीच' सरकार'' – साऱ्यांचे लक्ष वेधून घेतले आहे. परंतु ही केवळ घोषणा नाही तर एक कार्यपद्धती आहे, याचा प्रत्यय मला दुसरे काम करताना लगेच आला. जे निर्णय गावपातळीवर होऊ शकतात, ते गावाची ग्रामसभाच घेणार आणि अंमलबजावणीही करणार असा याचा व्यावहारिक अर्थ. गावासाठी रु. २.५० लाखाचे एक सभागृह मंजूर झाले. एक दिवस पंचायत समिती अभियंता व कंत्राटदार आले जागेची निश्चिती करायला. येथे निर्णय सर्वसहमतीने ग्रामसभेतच होतात. सर्वांनी गावाची मुख्य गरज, प्राधान्य यावर चर्चा केली. यातून असे समोर आले की, तीन मोहल्ल्यांमध्ये महिलांना स्वतंत्र अशा लहान इमारती हव्या आहेत. ग्रामसभेत निर्णय तसा झाला. पण अधिकारी प्रशासकीय अडचणी सांगू लागले. शेवटी जिल्हाधिकारी गावात येऊन महिलांशी सविस्तर बोलले. त्यांनाही ते पटले आणि निधी महिलांकडे हस्तांतरित झाला. गावाने मग श्रमदानातून त्याच पैशात तीन सुंदर इमारती बांधल्या, ज्यांची किंमत रु. सहा लाखांपर्यंत असू शकते. महिलांनाही हक्काची जागा मिळाली.

**वनहक्क कायदा :**

अनुसूचित जमाती व इतर पारंपरिक वननिवासी (वनहक्क) अधिनियम २००६ साली संसदेत मंजूर झाला. २००८ साली या कायद्याची अंमलबजावणी सुरू झाली. हा क्रांतिकारी कायदा आहे याची प्रचीती कायद्याची प्रस्तावना बारकाईने वाचल्यावर येते. ती प्रस्तावना अशी आहे – ''हा कायदा अशा वननिवासी अनुसूचित जाती व पारंपरिक वननिवासींकरिता दिला गेला आहे, ज्यांचे वास्तव्य पिढ्यान्‌पिढ्या जंगलात असूनही त्यांच्या हक्कांची कोणत्याही प्रकारची नोंद घेतली गेली नाही आणि अधिकाराला मान्यता दिली गेली नाही. असे वनहक्क न्याय्यपणे नोंदवून, त्याचे अभिलेख तयार करण्याची रचना निर्माण करून, त्यासाठी आवश्यक अशा विविध पुराव्यांचे स्वरूप सुनिश्चित करण्याची हमी हा कायदा देत आहे. वनहक्कांमध्ये संसाधनाच्या शाश्वत वापरासाठीचे अधिकार–जबाबदारी यांचा समावेश होतो. तसेच वापराच्या क्षेत्रातील जैवविविधतेचे संरक्षण व पर्यावरणाचे संतुलन राखण्याच्या दृष्टीने व्यवस्थापन करण्याचे अधिकार गावसमाजाला देऊन वनव्याप्त क्षेत्राची विकास प्रक्रिया कायद्याने मजबूत केली आहे. त्याचवेळी त्यात सहभागी असलेल्या स्थानिक जनतेची उपजीविका व अन्नसुरक्षेची खात्री हा कायदा देत आहे.

अनुसूचित जमाती व इतर पारंपरिक वननिवासींचे त्यांच्या परंपरागत जमिनी व वास्तव्य असलेल्या भूप्रदेशावरील वनहक्क हे ब्रिटिश वसाहतकाळात आणि स्वातंत्र्योत्तर काळातही झालेले वन बंदोबस्त व इतर धोरणात योग्य प्रकारे मान्य न केल्यामुळे या वननिवासींवर ऐतिहासिक अन्याय झाला आहे. कारण वननिवासींचे जीवनच मुळी 'वन' या पर्यावरणीय परिसंस्थेच्या अस्तित्वाशी व त्याच्या टिकाऊ विकासाशी एकात्म झालेले आहे. अशा प्रकारे प्रदीर्घ काळापासून प्रलंबित असलेल्या हक्कांविषयी असुरक्षिततेची भावना योग्य प्रकारे संबोधित करून ती दूर करणे हे अत्यंत आवश्यक झाले आहे. केंद्र–राज्य शासनाच्या विकासाच्या योजनांमुळे जबरदस्तीने ज्या समूहांचे त्यांच्या उपजीविका क्षेत्रामधून विस्थापन झाले आहे, अशांनाही न्याय देणे हे या कायद्याचे उद्दिष्ट आहे.''

**अंमलबजावणीत अडथळे :**

भारत सरकारच्या आदिवासी मंत्रालयाने हा कायदा केला आणि महसूल विभागाकडे अंमलबजावणीसाठी जबाबदारी सोपविली. दिलेल्या हक्कांमध्ये व्यक्तिगत शेतजमिनीचा अधिकार मिळणे ही फक्त एक बाब आहे. बाकीच्या सामूहिक हक्कांमध्ये दैनंदिन वापरासाठी वनस्रोतांचा उपयोग, गौण वनोपजावरील (बांबू, तेंदूपत्ता, मोह, मध, औषधी वनस्पती, इ.) स्वामित्व हक्क, जल/जलसंपत्तीचे हक्क,

चराईचे हक्क, पारंपरिक देवस्थानांचे हक्क आणि सर्वात महत्त्वाचा म्हणजे या सामूहिक वनक्षेत्रांचे संरक्षण, संवर्धन, पुनर्निमाण आणि व्यवस्थापन करण्याचा ग्रामसभेला मिळालेला हक्क.

अर्थातच नैसर्गिक संसाधनांवर सत्ता असलेले, लूट करणारे सर्व हितसंबंधी गट मात्र ताबडतोब सक्रीय झाले. देशपातळीपासून गावापर्यंत अंमलबजावणीमध्ये अडथळे आणायला सुरूवात झाली. जनतेमध्ये विविध प्रकारे गैरसमज पसरविले गेले. व्यक्तिगत जमिनीच्या दाव्यांना जाणीवपूर्वक प्रोत्साहन दिले गेले. या प्रकरणांना भ्रष्टाचाराचे कुरण बनविण्यात आले. सामूहिक वनहक्कांविषयी माहिती दडपून ठेवण्यात आली. खरेतर सर्व माहिती, प्रक्रियेचे अर्ज, इ. स्थानिक बोलीभाषेत छापून लोकांपर्यंत पोचवावेत आणि समजून सांगावेत असे निर्देश कायद्यात दिलेले आहेत.

**गोंडी पुस्तिकेचं रहस्य :**

आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्थेने (TRTI) जी कायद्याची पुस्तिका छापली आहे त्यात प्रस्तावनाच नाही, हे आम्ही पत्रकार परिषद घेऊन जाहीर केलं. कायद्यामध्ये अशी तरतूद आहे की, त्या त्या प्रदेशातील बोली भाषेतून लोकांना समजावून सांगण्याची जबाबदारी जिल्हा प्रशासनाकडे दिली आहे. गडचिरोलीत मराठीपेक्षा गोंडी भाषेचा जास्त वापर होतो. मग त्या भाषेतून पुस्तिका छापली आहे का, अशी आम्ही TRTI ला विचारणा केली तर त्यांनी दोन पुस्तिका पाठवल्या. पण त्या गोंडी भाषेत नव्हत्याच ! गोंडी म्हणून छत्तीसगढी भाषेत त्या छापल्या होत्या. मग आम्ही माहितीच्या अधिकारात विचारलं, की ही गोंडी भाषा आहे हे कोणी प्रमाणित केलं? एवढी एकच माहिती! पण अजून त्याचं उत्तर नाही. कारण पुस्तिका तर छापल्यात, पैसे खर्च केलेत, पण त्या गोंडीत नाहीत. मग त्यांनी सारवासारव सुरू केली.

**सामूहिक वनहक्क महत्त्वाचा :**

या सर्व पार्श्वभूमीवर मेंढ्याच्या ग्रामसभेसोबत आम्ही अभ्यासपूर्ण प्रक्रियेला सुरूवात केली. एक दिवस असा निर्णय घेतला, की गावाचा सामूहिक वनहक्काचा दावा आधी करायचा, मग व्यक्तिगत जमिनीचे दावे करायचे. आमचे जीवन जंगलाशी निगिडत आहे, जवळजवळ ८०% उपजीविका वनोपजावर आधारित आहे तर अशावेळी केवळ शेतीचे काही तुकडे मिळून भविष्यातील पिढीचे आयुष्य कसे असेल ?

आसाम, छत्तीसगड आणि महाराष्ट्रात कितीतरी जंगल क्षेत्र खाणींसाठी, मिनरल वॉटर फॅक्टरीसाठी किंवा लीजने विविध खाजगी उद्योगांना दिलं गेलं आहे. आम्ही त्यांना यामुळे झालेल्या दुष्परिणामांचे फोटो, चित्रफिती दाखविल्या. त्यांच्या जंगलाचा नकाशा समोर चिकटवून त्यांना दाखवायचो, तुम्हाला असे व्यक्तिगत जमिनीचे छोटे–छोटे तुकडे दिले आणि बाकीचं जंगल खाण व इतर उद्योगांसाठी दिलं, तर काय होईल? हे सांगितल्यावर ते जागे झाले. मुख्यत: तिथल्या युवा पिढीने यात लक्ष घालायला सुरुवात केली.

**दावा दाखल प्रक्रिया :**

वनहक्क कायद्याचा मूळ गाभा समजावून घेऊन ग्रामसभेने दावा दाखल करण्याची प्रक्रिया सुरू केली. ही एक अर्धन्यायिक प्रक्रिया आहे, ज्यात तुम्ही हक्काची सरकारकडे मागणी करत नसून, जो तुमचा हक्क परंपरेने आहेच त्यावर दावा करायचा आहे. मग महसूल विभागाने त्यावर प्रक्रिया करून जिल्हा समितीचे अध्यक्ष, जिल्हाधिकारी यांनी त्यांला मान्यता देऊन अधिकार अभिलेख ग्रामसभेला सोपवायचा आहे. नियम १२(४) अनुसार संबंधित सर्व कागद ग्रामसभेला विभागांनी द्यायचे आहेत. अनेक गावांनी आम्ही तयार केलेल्या नमुन्यात विविध तालुक्यांत अर्ज करणे सुरू केले. जिल्हाधिकाऱ्यांनीही सकारात्मक प्रतिसाद देऊन एक दप्तर तयार केले व प्रत्येक गावापर्यंत पोचविले. या दप्तरात पुराव्यासाठी लागणारे विस्तारपत्रक, गाव नकाशा, मतदार यादी, अभिलेख पंजी, अर्ज, कार्बन कागद, टाचण्या, शिक्के, स्टँपपॅड, इ. सर्व गोष्टींचा अंतर्भाव केला गेला. संपूर्ण देशात फक्त एका जिल्ह्यात हे घडले! लोकही कागदपत्रे समजावून घेऊ लागले, प्रश्न विचारू लागले.

प्रत्यक्ष दावा जेव्हा तयार करायला घेतला, तेव्हा अनेक बारकावे लक्षात येऊ लागले. इतर जिल्ह्यातल्या संस्था, देशातील अभ्यासक/कार्यकर्ते यांच्याशीही देवाण–घेवाण सुरू केली. कुठेच सामूहिक दावा तयार झाला नव्हता. ग्रामसभेत एक दिवस चर्चा करता करता एक मूलभूत गोष्ट लक्षात आली. दावा कोणी करायचा आहे? मग उत्तर आले, आम्ही गावातल्या लोकांनी. मग आम्हाला जी माहिती आहे, उपलब्ध कागद आहेत त्याच्याच आधारे स्वतःच्या भाषेत दावा भरायचा. पुढची जबाबदारी प्रशासनाची आहे. मग सर्वांनी बोजड शब्द, पांडित्यपूर्ण समर्थने इ. बाजूला ठेवून सर्वांना समजेल अशा सोप्या भाषेत अर्जाचे रकाने भरण्यास सुरूवात केली. त्रुट्या, वाद टाळण्यासाठी कायदा व नियमातीलच शब्द जसेच्या तसे वापरले. मूळ कायद्यात नसलेले पण लोकांना अडचणीत आणणारे काही रकाने राज्यशासनाने नमुन्यात घुसडले आहेत. उदा. गौण नवोपज, जलसंपत्ती, चारा यांचे वापराचे परिमाण (संख्या) लिहिणे आवश्यक आहे. आता हे परिमाण दरवर्षी निसर्गातील बदलानुसार, आवश्यकतेनुसार निरनिराळे असते. पण रकाना तर भरलाच पाहिजे. शेवटी काय लिहायचे? लोकांनी सांगितले – 'जितक्या प्रमाणात उपलब्ध आहे, जितके गोळा करतो, जितके वापरतो व जितक्याची विल्हेवाट लावतो तितके', असे लिहू. तसेच सर्व पुराव्यांच्या प्रती जोडाव्यात असे बंधनकारक आहे. तिथे आम्ही लिहिले, 'वर नमूद केलेल्या पुराव्यांचे मूळ अभिलेख व दस्तऐवज शासनाकडे असल्याने पुन्हा त्याच्या सत्यप्रती करून जोडलेल्या नाहीत'. यावर खूप आक्षेप घेतले गेले पण हे युक्तिवाद कोणीच खोडू शकले नाहीत.

सदर दावा तयार करतानाच संबंधित अधिकारी, अभ्यासक यांची मते जाणून घेतली. त्यामुळे संभाव्य आक्षेप/त्रुटी समजून दुरुस्त्या होत गेल्या. अधिकाऱ्यांनाही विश्वासात घेतल्याने विरोध मावळून सामंजस्याचे वातावरण तयार झाले. गावपातळीवरही सतत संवादातून सर्व कर्मचाऱ्यांची समज तयार झाली. मोहनभाऊ व माझी जिल्हा वनहक्क सल्लागार म्हणून नियुक्ती केली गेली, ज्यामुळे बैठकांमध्ये अधिकृतपणे सहभागी होता आले.

**हितसंबंधांशी झुंज :**

मेंढा (लेखा) व मारदा या दोन ग्रामसभांनी दावा दाखल करण्यासाठी पुढाकार घेतला दावे दाखल होऊन दोन महिने झाले तरी कार्यवाही सुरूच झाली नाही. मग माहितीचा अधिकार, दप्तर दिरंगाईचा कायदा, लोकशाही दिनात तक्रार ही आयुधे वापरल्यावर पुढील प्रक्रिया सुरू झाली. जिल्हा समितीत दाव्यावर प्रचंड चर्चा झाली. वन अधिकारी सर्व बुद्धिचातुर्य, कौशल्य तसेच दबावतंत्राचा वापर करत होते. आम्ही सर्व आक्षेपांना अभ्यासपूर्ण, शांतपणे उत्तरे दिली. प्रदीर्घ काळानंतर एखाद्या समूहाला कायद्याने दिलेले न्याय्य हक्क नाकारण्यासाठी लोकसेवकच कसे सर्वस्व पणाला लावतात याचा विदारक अनुभव येत होता. तीन–चार बैठकांमध्ये तासन्तास चर्चा झाल्या. यामध्ये व्यक्त झालेली पुढील विधाने कोणती मानसिकता दर्शवितात?

'या आदिवासींना असे मालकी हक्क मिळाले तर ते श्रीमंत होतील, स्लॅबची घरे बांधतील'; 'त्यांची जीवनशैली बदलेल आणि संस्कृती लोप पावेल'; 'आदिवासींना जंगलाशी का जोडता, त्यांना आपल्याला मूळ प्रवाहात आणायचे आहे'; 'लोकांना जंगलाचे शास्त्रीय ज्ञान नाही, व्यवस्थापन करण्याची पात्रता नाही'; 'दैनंदिन गरजेसाठी, वनोपज आणायला हरकत नाही'; 'गळून पडलेल्या वस्तू गोळा करू शकतात, झाडावरून तोडण्याची परवानगी कशी देणार?'

**अखेर मंजुरी :**

अखेर १४ ऑगस्ट २००९ च्या बैठकीत जिल्हाधिकाऱ्यांची हा सामूहिक वनहक्काचा दावा पूर्णपणे योग्य, कायदेशीर असल्याची खात्री पटली. त्यांनी अध्यक्ष या नात्याने सर्व विरोधाला न जुमानता दावा मंजूर केला. सुदैवाने पालकमंत्री जिल्ह्यातच होते. आम्ही त्यांना हा देशातील पहिलाच मंजूर झालेला सामूहिक दावा आहे आणि गडचिरोलीसाठी ही अभिमानास्पद गोष्ट आहे हे पटवून सांगितले.

त्यांनी लगेच प्रशासनाकडून खात्री केली आणि स्वातंत्र्यदिनाच्या कार्यक्रमात मेंढा (लेखा) व मारदा या गावांचे सामूहिक वनहक्क मंजूर झाल्याचे जाहीर भाषणात सांगितले. यामुळे मंजुरीवर शिक्कामोर्तब झाले. परंतु, अभिलेखावर उपवनसंरक्षक आणि आदिवासी उपायुक्त सही करायला तयार नव्हते. घोषणा होऊन महिना उलटला तरी ग्रामसभेला लेखी सूचना मिळेना. स्मरणपत्रे पाठविली, माहितीचा अर्जही पाठवला. काही अधिकारी अनवधानाने दावा मंजूर झाला आहे, गंभीर त्रुट्या आहेत असा अपप्रचारही करत होते. शेवटपर्यंत दावा कसा नाकारता येईल असा प्रयत्न झाला. शेवटी मुख्यमंत्री व राज्यपाल यांना पत्र पाठवून दाद मागावी लागली. आणि अखेर १५ डिसेंबर २००९ रोजी राज्यपालांच्या हस्ते ग्रामसभांना अधिकार प्रदान करण्यात आले. मेंढा (लेखा) ग्रामसभेला १८०९ हेक्टर आणि मारदा गावाला २११ हेक्टर वनभूमीवर समग्र सामूहिक हक्क मिळाले. वनहक्क कायद्याच्या अंमलबजावणीत संपूर्ण देशासाठी ही एक महत्त्वाची घटना ठरली.

**मार्गदर्शक पुस्तिकेची निर्मिती :**

रीतसर कायदेशीर प्रक्रिया पूर्ण करून हे वनहक्क मंजूर झाल्याने सर्व गावांमध्ये, कार्यकर्त्यांमध्ये एक आशेचे वातावरण तयार झाले. मेंढ्याकडे लोकांचा ओघ वाढला. आता आमची जबाबदारी वाढली. पहिला दावा तयार करतानांची सर्व प्रक्रिया आम्ही शब्दबद्ध केली. यात सर्व महत्त्वाचे मुद्दे, अडचणी, चुका, प्रश्नोत्तरे, स्पष्टीकरणे, इ. सविस्तर मांडले. कृतीच्या नेमक्या १० पायऱ्या, काय करायचे याच्या सूचना आणि भरावयाचे नमुने, ज्यात फक्त गाळलेल्या जागा संबंधित गावाने भरावयाच्या आहेत, अशी सुबोध, सोपी मार्गदर्शिका या मांडणीतून आकाराला आली. ६–७ तालुक्यांमध्ये विविध संस्थांची मदत घेऊन अनेक गावांनी दावे करण्यास सुरूवात केली. प्रशासनातील चांगल्या अधिकाऱ्यांनी तालुका पातळीवर प्रशिक्षणे आयोजित केली. अशा सूत्रबद्ध अभियानामुळे पुढील वर्षभरात इतर ७०० गावांनी ३ लाख एकर वनक्षेत्रावर सामूहिक वनहक्क मिळविले. जून २०१२ च्या आकडेवारीनुसार गडचिरोली जिल्ह्यातील ८०५ गावांना ३,७२,६५८ एकर वनक्षेत्रावर सामूहिक वनहक्क मिळाले आहेत. संपूर्ण महाराष्ट्रात मंजूर झालेल्या एकूण सामूहिक वनक्षेत्रात गडचिरोलीचा वाटा ९८% आहे. तसेच भारतातील एकूण मंजूर क्षेत्रापैकी ८०% क्षेत्र एकट्या गडचिरोलीचे आहे! आता तर सामूहिक वनहक्क मार्गदर्शिका जिल्हा प्रशासनाने अधिकृतपणे प्रकाशित करून राज्यभर वितरित केली आहे. तसेच जिल्ह्याच्या वेबसाईटवरही टाकली आहे. ही प्रक्रिया ‘कहाणी यशस्वी सामूहिक वनहक्क दाव्यांची’ या पुस्तिकेच्या रुपाने राष्ट्रीय जन वकालत अध्ययन केंद्राने (NCAS) एप्रिल २०१० मध्ये प्रकाशित केली. राष्ट्रीय पातळीवर पोचविण्यासाठी ‘कागज की लढाई कागजसे’ ही हिंदी पुस्तिका व त्यावर हिंदीतून सुलभ विवेचन करणारी चित्रफीतही बनविली. देशातील असंख्य ग्रामसभांसाठी हे साहित्य प्रेरणादायी ठरत आहे.

**बांबू हे लाकूड की गौण वनउपज :**

वनहक्कांना मान्यता तर मिळाली, आता वेळ आली ते ग्रामसभेने हक्क प्रस्थापित करण्याची. वन व्यवस्थापनाचे नियम तयार केले. विविध कामांसाठी कार्यकारी समित्या निवडल्या गेल्या. ग्रामसभेने स्वतः वनाची कार्य योजना करून अंमलात आणण्याच्या निश्चयाने वाटचाल सुरू केली. आता तर गौण वनोपजावर स्वामित्व हक्क मिळाले, त्यामुळे दोहनाचे नियोजन करणे गरजेचे होते. पाच कक्षांपैकी एका कक्षातील बांबू पक्व होऊन कापणीयोग्य झाला होता. ग्रामसभेने बांबूची कापणी व विक्री करण्याचा निर्णय घेतला व मार्गदर्शनासाठी वन विभागाला जाने २०१० मध्ये पत्र दिले. पत्राचा पाठपुरावा सुरू झाला. अधिकारी एकसुरात म्हणू लागले की हा हक्क तुम्हाला वापरता येणार नाही, त्यासाठी सर्व वन कायद्यामध्ये बदल करावा लागेल. शिवाय बांबू हे लाकूड आहे. चुकीने त्याला गौण वनोपज संबोधले गेले आहे. ‘तुम्ही कोणतेही स्वप्न पाहू नका, इतके अधिकार सरकार देईल असे कसे वाटले?’ असे थेट विधान एका बैठकीत केले गेले.

तेव्हा आम्हाला पुढील आव्हानांची कल्पना आली. राज्य व देशपातळीवरही पर्यावरण–वन्यजीव क्षेत्रात काम करणाऱ्या संस्था, अभ्यासक, पत्रकार तसेच निवृत्त वनाधिकारी यांना हाताशी धरून 'आता ग्रामसभा जंगल तोडून टाकेल, लोकांना शास्त्रीय पद्धतींचे ज्ञान नाही' असा विविध पद्धतीने शिस्तबद्ध अपप्रचार सुरू केला गेला. नकाराची कारणे नमूद करून लेखी पत्र मात्र दिले गेले नाही. आम्ही सर्व पातळ्यांवर हा विषय लावून धरला, पत्रकार परिषद घेऊन भूमिका स्पष्ट केली. परंतु या सर्व दिरंगाईत कापणीचा हंगाम उलटून गेला.

**सत्याग्रह सुरू :**

२०१०–११ मधील बांबू कापणीचा हंगाम सुरू झाला. बांबू कापणी वर्ष हे १ ऑक्टोबर ते ३१ मे पर्यंत असते. पुन्हा एकदा पत्रे पाठविण्याचा कार्यक्रम सुरू झाला. अखेर फेब्रुवारी २०११ मध्ये वनविभागाने सहा पानी पत्र पाठवून ग्रामसभेला वनहक्क नाकारले! 'वापराल तर गुन्हेगार ठराल', असा इशाराही दिला. मधल्या काळात आम्ही ग्रामसभेसोबत सातत्याने बसून कापणीचे नियम, शास्त्रीय पद्धती, पूर्वीचे वनकायदे यांचा सखोल अभ्यास केला.

अशाच एका बैठकीत एका जाणत्या माणसाच्या प्रश्नाने कोंडी फुटली. त्याचे म्हणणे 'वनहक्क सरकारनेच कायदा बनवून मान्य केले, इतक्या संघर्षानंतर अधिकार अभिलेखाही दिला. आणि आता सरकारी विभागच म्हणतो तुम्हाला दिलेले हक्क बेकायदा आहेत! जर आपण 'आमच्या गावात आम्हीच सरकार' म्हणतो, तर हक्काच्या अंमलबजावणीसाठी परवानगी किती वेळ मागत राहणार?' याच ग्रामसभेत १५ फेब्रुवारी २०११ रोजी सत्याग्रह करायचा निर्णय झाला. यात सर्वजण जंगलात जातील, एकेक बांबू तोडून आणतील, गावात थप्पी लावली जाईल आणि जाहीरपणे विक्रीला सुरुवात होईल असे ठरले. संबंधित विभागांना याची रीतसर पत्रे दिली, वर्तमानपत्रातही जाहीर केले. ग्रामसभेची भूमिका कायद्याच्या अंमलबजावणीची आहे, हे स्पष्ट केले.

सकाळी ठरल्याप्रमाणे ग्रामसभा झाली. सर्वांनी रजिस्टरमध्ये नोंदणी केली. विविध विभागांचे अधिकारी, कर्मचारी, संस्थांचे कार्यकर्ते, पत्रकार इ. असंख्य लोक काय घडणार, याची उत्कंठतेने वाट पहात होते. वनविभागाने गुन्हा दाखल करायची तयारी केली होती. काही कार्यकर्ते लोकांना भडकावून कायदा व सुव्यवस्थेचा भंग करताहेत अशी पत्रेही पोलिसांना दिली गेली होती. सर्व लोकांचा निर्धार कायम होता. परिणामांना सामोरे जायची तयारी होती. बांबू कापून गावात ढीग लावला गेला. आता अधिकारी म्हणू लागले, तुम्ही कापू शकता पण विक्री करणे हा गुन्हा ठरेल. दोन दिवसांनी विक्री सुरू होईल असे ग्रामसभेने जाहीर केले. गडचिरोली विधानसभा क्षेत्राचे आमदार नामदेव उसेंडी यांनाही लोकप्रतिनिधी या नात्याने जनतेच्या हक्काच्या लढाईत सामील होण्याचे आवाहन केले. आणि आमदारांनी गावात येऊन पहिला बांबू खरेदी केला. विक्री सुरू झाली. अनेक स्थानिक शेतकऱ्यांनी खरेदीस प्रारंभ केला.

**बांबू मुक्ति दिन :**

आता वेळ आली खरेदी केलेला बांबू गावाबाहेर न्यायची. त्यासाठी वनविभागाकडून वाहतूकपरवाना (Transit Pass - TP) घ्यावा लागतो. येथे शेवटची अडवणूक सुरू झाली. तुम्ही सर्वांनी गुन्हा केला आहे, सबब टीपी मिळणार नाही. अतिशय ताणाची, संवेदनशील परिस्थिती निर्माण झाली. यातून मार्ग काढण्यासाठी मुख्यमंत्री, केंद्रीय मंत्री यांना ग्रामसभेने आवाहन केले. हक्क परत करू असेही कळविले. देशभर वृत्तपत्रे, मासिके, कार्यशाळा यांमध्ये बांबू आणि वनहक्क यावर वादविवाद सुरू झाला. अखेर कायद्याची खऱ्या अर्थाने अंमलबजावणी करण्यासाठी लोकशक्तीचा दबाव शासनावर निर्माण झाला. परिस्थितीचे गांभीर्य ओळखून केंद्रीय वन व पर्यावरण मंत्री श्री. जयराम रमेश य़ांनी हस्तक्षेप केला. मी स्वतः मुख्यमंत्र्यांना घेऊन मेंढ्यात जाणार आणि टीपी पुस्तक प्रदान करणार, असे त्यांनी जाहीर केले.

२७ एप्रिल २०११ हा खऱ्या अर्थाने 'बांबू मुक्ती दिन' ठरला. या दिवशी एका भव्य कार्यक्रमात राज्याचे अनेक मंत्री, अधिकारी, देशभरातून आलेले अभ्यासक,

कार्यकर्ते, पत्रकार, केंद्रीय वनमंत्री इ. सर्वांच्या उपस्थितीत ग्रामसभेला 'टीपी पुस्तक' प्रदान करण्यात आले. तसेच सामूहिक वनहक्कांची समग्र दृष्टीने सकारात्मक अंमलबजावणी करण्याची ग्वाही सर्व जनतेला दिली गेली. बांबू कापणी–विक्रीतील सर्व अडथळे दूर झाले!

**बांबूचे अर्थकारण :**

हंगाम संपायला फक्त एक महिना उरला होता. आम्ही वेगाने पावले उचलली. कापणीचे नियम, मजूर गटांचे जागेनुसार नियोजन झाले. संभाव्य खरेदीदारांबरोबर चर्चा सुरू जाल्या. जास्तीत जास्त भाव रु. २३/– प्रति बांबू देणाऱ्याशी करारनामा करण्यात आला. आर्थिक व्यवहार करण्यासाठी विविध प्रकारची नोंदणी करण्यासाठीही ग्रामसभेला सर्व विभागांशी संघर्ष करावा लागला. पॅन, टॅन, व्हॅट इ. ची पूर्तता करण्यात आली. स्टेट बँकेत चालू खाते उघडण्यात आले. शिस्तबद्ध रीतीने जबाबदाऱ्या प्रत्येकाने पार पाडल्या आणि एका महिन्यात ९०,००० बांबूंची कापणी–विक्री–वाहतूक हे सर्व व्यवहार पूर्ण झाले. एकूण रु. २२ लाखांची उलाढाल झाली. गावातील १०० कुटुंबांना मजुरीच्या रुपात रु. आठ लाख दिले गेले. इतर खर्च वजा जाता रु. १२.५० लाख निव्वळ नफा ग्रामसभेचा विकासनिधी म्हणून वेगळ्या खात्यात जमा करण्यात आला. यापैकी ५०% निधी शिक्षण व आरोग्य विषयक नाविन्यपूर्ण प्रकल्पांवर खर्च करण्याचा निर्णय ग्रामसभेने घेतला आहे.

बांबूच्या व्यवस्थापनासंदर्भात नियोजनपूर्वक पारदर्शक व्यवहार करून मेंढा ग्रामसभेने एक नवीन पायंडा पाडला. सन २०११–१२ मधील हंगामात ही पद्धत कायदेशीर, परिपूर्ण करण्यासाठी सखोल अभ्यास करून ग्रामसभेतर्फे निविदा काढण्यात आली. विविध राज्यांतील खरेदीदार या प्रक्रियेत सहभागी झाले. स्पर्धात्मक वातावरणामुळे लांब बांबूला रु. ३३/– आणि मध्यम बांबूला रु. १६/– असा दर निश्चित झाला. यावर्षी मोठ्या प्रमाणावर कापणी होणार असल्याने आजूबाजूच्या गावातील मजूरही सहभागी झाले. मागील अनुभवांपासून शिकून प्रतिव्यक्ती प्रतिदिन ५० बांबू तोडण्याचे बंधन घालण्यात आले. तसेच बेटाची पूर्ण सफाई करण्याचा नियम केला गेला. बांबूचा ढीग रचण्याची पद्धती ठरविली. या हंगामात एकूण ३ लाख बांबू, ३० गावांमधील ४३२ मजुरांनी कापला. एकूण रु. ९४ लाखांची उलाढाल झाली. यापैकी रु. ४० लाख मजुरीच्या रुपात दिले गेले. इतर खर्च वजा जाता निव्वळ नफा रु. ५० लाख ग्रामसभेचा विकास निधी म्हणून जमा झाले. जंगलातील सर्व प्रकारची कामे, मोजमाप, हिशोब, बँकेचे व्यवहार इ. सर्व जबाबदाऱ्या गावातीलच युवक गटाने यशस्वीपणे पार पाडल्या. संगणकाचा प्रभावी वापर करण्यात आला.

**अन्य राज्यात चळवळीचा प्रसार :**

याच वर्षी जिल्ह्यातील इतर ५ गावांनीही पुढाकार घेत बांबूची विक्री करून जवळजवळ रु. २ कोटींचे उत्पन्न मिळविले. मेंढ्याने तयार केलेली सर्व प्रक्रिया, नमुने त्यांनी वापरल्याने वाटचाल सुकर झाली. आता ही अनोखी चळवळ इतर राज्यांतील गावांतही पसरत आहे. अलीकडेच ओडिसा मधील ग्रामसभेला बऱ्याच संघर्षानंतर टीपी प्रदान केला गेला. आंध्रप्रदेश, मध्यप्रदेश येथे अजून ग्रामसभा झगडत आहेत. तसेच व्यवस्थापन अधिक परिपूर्ण करण्यासाठी देशभरातील अनेक संस्था, अभ्यासक यांच्यासोबत पुढील काम सुरू झाले आहे.

प्रा. माधव गाडगीळ व आघारकर संशोधन संस्था, पुणे यांच्या सहकार्याने २० गावांमधील जैवविविधतेचा अभ्यास आम्ही केला. यात पिकांचे पारंपरिक वाण, गवतांच्या व माशांच्या प्रजाती, पारंपरिक व्यवस्था, सण इ. चा सविस्तर दस्तऐवज तयार केला गेला. या अभ्यासावर आधारित 'महाराष्ट्र जनुक कोश' अंतर्गत प्रस्ताव तयार झाला.

विविध समुचित तंत्रज्ञानांचा वापर, शास्त्रीय सर्वेक्षणाच्या पद्धती यांचे प्रशिक्षण सुरू आहे. संपूर्ण १८०० हेक्टर वनक्षेत्र ७० टापूंमध्ये विभागून स्थानिक नावांसह नकाशे तयार होत आहेत. जवळजवळ १८० वनस्पतींच्या नोंदी, जैवविविधता निरीक्षणे, छायाचित्रे,

नमुने गोळा करणे, संगणकीय डेटाबेस तयार करणे असे विविधांगी कार्यक्रम सुरू झाले आहेत.

**ग्रामतंत्रज्ञ गट :**

गावाच्या वनक्षेत्राच्या सविस्तर अभ्यासाअंती ग्रामसभेने मृद् व जैव संधारणाचे काम प्राधान्याने करण्याचा निर्णय घेतला. यासाठी गावाने स्वयंपूर्ण व्हायचे ठरविले. १५ युवक-युवतींचा 'ग्रामतंत्रज्ञ गट' प्रशिक्षण घेऊऩ पाणलोट क्षेत्राचे सर्वेक्षण,अंदाजपत्रके इ. कामे करण्यास सज्ज झाला आहे. रोजगार हमी योजनेतून ही सर्व कामे करण्यासाठी एका विशेष शासकीय निर्णयाद्वारे ग्रामसभेला कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून मान्यता मिळाली आहे. ग्रामसभाच नियोजन करून मजुरांच्या सोयीनुसार कामे करत आहे. ५० हेक्टरवरील उपचार पूर्ण झाले आहेत. बाएफ संस्थेचे तांत्रिक मार्गदर्शन व जिल्हा प्रशासनाची मदत मिळत आहे. एरवी गावामधून स्थलांतरित होणारी शिकलेली युवकपिढी यानिमित्ताने नैसर्गिक संसाधनांशी जोडली गेली आहे. या कामामुळे त्यांना कुशल रोजगारही मिळत आहे. हाही पथदर्शी प्रकल्प आता सामूहिक वनक्षेत्र मिळालेल्या अनेक गावांनी राबविण्याची तयारी दाखविली आहे.

बांबू या विषयावर एक स्वतंत्र अभ्यासगट तयार झाला आहे. बांबूच्या इतर उपयुक्त प्रजाती, बांबू टिकाऊ होण्यासाठी प्रक्रिया, मूल्यवर्धनाचे विविध पर्याय यांचा अभ्यास सुरू झाला आहे. कारागीरांचा गट विविध ठिकाणी प्रशिक्षण घेत आहे. भारत सरकारच्या विज्ञान आणि तंत्रज्ञान विभागाच्या सहकार्याने या प्रकल्पाची अंमलबजावणी सुरू आहे. या अंतर्गत बांबूची नर्सरी, यंत्रे/अवजारे यांनी युक्त अशी कार्यशाळा उभारली आहे. बांबू या विषयावर काम करणाऱ्या देशभरातील संस्थांना मेंढ्याशी जोडून घेतले आहे.

**विधायक कामांसाठी संघटन :**

भविष्यात ग्रामसभांची संघटित व्यवस्था व ताकद निर्माण होण्यासाठी जिल्हा पातळीवर महासंघ स्थापन होणे आवश्यक आहे. अन्यथा पुन्हा शोषण करणारी नवीन व्यवस्था विरोधी गटाकडून उभी केली जाऊ शकते. विविध हेतूने व्यापारी, राजकारणी, उद्योजक यांनी ग्रामसभांना ताब्यात घेण्याचा प्रयत्न सुरू केला आहे. महासंघाची भक्कम रचना ही सर्व आह्वाने पेलण्यासाठी वेगाने निर्माण करण्याची गरज आहे. आम्ही याही बाबतीत पुढाकार घेऊन जिल्हा पातळीवर समन्वय बैठकांचे आयोजन प्रशासनाच्या साहाय्याने सुरू केले आहे. मध्यप्रदेश, छत्तीसगड येथील अशा रचनांचा अभ्यास करत आहोत. गौण वनोपजांची विक्री /प्रक्रिया हे एक मोठे दालन खुले झाले आहे. या विषयावर काम करणाऱ्या सहा राज्यांतील संस्थांचा एक गट मेंढा येथे नियमितपणे जमण्यास सुरूवात झाली आहे.

**विज्ञान 'गोटूल' :**

ग्रामसभेद्वारे अशा सर्व प्रकल्पांचे व्यवस्थापन चोख आणि पारदर्शकतेने होण्यासाठी समग्र प्रशासन प्रणालीची तातडीने आवश्यकता भासत होती. संगणक तंत्रज्ञानाचा प्रभावी वापर करून गावातीलच युवागटाला प्रशिक्षित करत अशी प्रणाली विकसित करण्यासाठी एविझ सॉफ्टवेअर या उद्योगाचे मार्गदर्शन मिळत आहे.

नैसर्गिक संसाधनांच्या शाश्वत विकासासाठी मनुष्यबळ घडणीची रचना आवश्यक आहे. सध्याच्या शिक्षण पद्धतीतून हे घडणे अवघड दिसते. अशा निसर्गाधारित, आनंददायी शिक्षण व्यवस्थेची स्थापना करण्याचे प्रयत्न मेंढ्यात सुरू आहेत. गोंड आदिवासींमधील 'गोटूल' ही पूर्वीच्या काळी जीवनशिक्षण देणारी चांगली रचना होती. कृतीतून, अनुभवातून, एकमेकांकडून शिकणे ही गोटूलची वैशिष्ट्ये होती. आधुनिक ज्ञान-विज्ञानाचा अंतर्भाव करून 'विज्ञान गोटूल' ही संकल्पना विकसित केली जात आहे. वननिवासींवरील ऐतिहासिक अन्याय या चळवळीमुळे दूर तर झाला आहेच, पण त्यांच्या सांस्कृतिक परंपरांचे जतन करीत विज्ञानामुख शाश्वत विकासाची पहाट त्यांच्या क्षितिजावर दिसू लागली आहे.

